# बोडण

बोडण हा सण नसून ते एक धार्मिक कृत्य आहे. धार्मिक कृत्य म्हणा अगर धार्मिक विधी म्हणा, दोन्ही याचा अर्थ एकच बोडण. हा विधी (चित्तपावन) कोकणस्थ ब्राह्मणांकडे करतात. सर्व साधारण सर्व कोकणस्थांची कुलस्वामिनी योगेश्वरी आहे. कुलस्वामिनी कोणतीही असो, आपल्या घराण्यावर देवीची अखंड कृपा व्हावी म्हणून शुभकार्यानंतर बोडण भरण्याचा प्रघात आहे. उदा. घरात बाळाचा जन्म झाला, व्रतबंध, विवाह झाला, नवीन घर घेतले, संकट समयी बोललेल्या नवसाचेसुद्धा बोडण भरतात. तर काही जणांकडे वार्षिक कुळाचार म्हणूनही बोडण भरतात. आणि देवीचा उत्सव, देवीचा आनंद करायला कारणच कशाला हवे? आपल्या घराण्यात जर बोडण असेल तर आपल्याला वाटेल तेव्हा बोडण भरावयास हरकत नाही.

पण त्याला सुद्धा बंधन आहे बरे कां? वर्षाचेमहिने बारा, त्यात पहिला महिना चैत्र. हा महिना बोडणाला वर्ज्य, का तर चैत्र गौरीचा उत्सव चालू असतो. दुसरा वैशाख अक्षयतृतीयेनंतर पूर्ण महिना बोडण भरू शकता. जेष्ठ महिना पूर्ण बोडणास योग्य. आषाढात चातुर्मासाला प्रारंभ झाल्यावर कार्तिकात चातुर्मास समाप्ती (कार्तिक शुद्ध द्वादशी) पर्यंत बोडण वर्ज्य. मार्गशिर्ष महिना सर्वात उत्तम. पौष बोडणाला वर्ज्य. माघ, फाल्गुन हे महिने बोडण भरण्यास योग्य. आता आपण तिथीचा विचार करू. शुद्ध व वद्य पक्षातील पहिल्या पाच तिथी अती शुभ. जेवढे महिने योग्य आहेत तेवढ्यातीलच तिथींचा विचार करणे. पहिल्या पाचातील चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, एकादशी, अमावास्या या तिथी वर्ज्य आहेत.

मंगळवार व शुक्रवार उत्तम. आपतप्रसंगी गुरूवार, रविवार पण धरतात. पण सोमवार, बुधवार, शनिवार वर्ज्यच करावेत. तसेच घरात कोणाचे निधन झाले असेल तर एक वर्ष होईपर्यंत (वर्षश्राद्ध) बोडण वर्ज्य आहे. तसेच घरात कोणी गरोदर असेल तर ती प्रसुत होऊन सव्वा महिना होईपर्यंत बोडण भरत नाहीत. पण माहेरवाशिण गरोदर असेल तर बोडण बरण्यास करहत नाही, फक्त तिने पूजा पहायची नाही. आपल्या शहरात हा प्रश्न येत नाही परंतु खेड्यात गोठ्यात गाय गाभण असेल तर बोडण भरायचे नाही.

बोडणासाठी बाहेरच्या तीन सुवासिनी व एक कुमारिका आमंत्रित करतात. तीन सुवासिनी म्हणजे श्री महाकाली, श्री महालक्ष्मी, श्री महासरस्वती व कुमारिका म्हणजे नवदुर्गा व घरातील सुवासिनी पाचवी अशा प्रत्येक बोडणासाठी पाच जणींची गरज असते. एकावेळी दोन बोडण केली तर दहा जणी लागतात. एकवेळेला दोनपेक्षा जोस्त बोडण भरू नये.

सुवासिनी बोलावताना सासू-सुन, आई-मुलगी, जावा-जावा, बहिणी-बहणी, नणंद-भावजय असे नाते असू नये. दोन बोडण एकत्र केली तरी पाचच बायका कालवायला बसवाव्या व बाकीच्या नंतर जेवावयास बसवाव्या. सर्व सुवासिनींना आत घेताना पायावर कोमट पाणी, दूध व परत पाणी घालावे, तसेच पायावर स्वस्तिक काढावे, हळद-कुंकू लावावे व ओवाळून आत घ्यावे. कुमारिका सांगताना तिचे वय तीन ते दहा वर्षे असेल याची काळजी घ्यावी.

बोडणासाठी स्वयंपाक :- वरण भात, भाजी, खीर, पुरण, लिंबू, चटणी, कोशिंबीर (दह्यातील), पुरणपोळी अथवा वडे घारगे, भाजणीचे वडे अथवा भजी. सात नैवेद्य वाढावेत. पाच बोडणासाठी, एक घरच्या देवांसाठी, एक मुख्य देवीसाठी. स्वयंपाक सोवळ्याने करीत परंतु आता धुतवस्त्र हेच सोवळे समजतात म्हणून धुतवस्त्राने स्वयंपाक करावा. काळाप्रमाणे बदल आवश्यक आहे. बोडण काय किंवा कुठचेही देवकार्य करताना काळे वस्त्र घालू नये. नैवेद्य केळीच्या पानावरच वाढावेत कारण नैवेद्य दाखवून झाल्यावर काहींकडे ते आत कालवण्यास घेतात तर काहींकडे ते तसेच ठेवतात.

देवीचे अलंकार :- कणकेत किंचीत हळद टाकून कणिक भिजवावी, देवीला बसण्यास पाटा, टेकण्यास लोड म्हणून वरवंटा, तसेच हारा-डेरा दूध घालण्यास, सुवासिनी घालतात ते सर्व अलंकार देवीसाठी पिठाचे करतात. तसेच पाच दिवे व त्यात फुलवात व तुप. कारण देवाला ओवाळण्यास तुपाचा दिवा तर माणसांना ओवाळण्यास तेलाचा दिवा वापरतात.

पूजेची तयारी :- हळद-कुंकू, गंध, अक्षता, फुल, कापसाची वस्त्र,पैसा, सुपारी, गौरीची लेणी कणकेची, अत्तर, पंचामृत, कोमट पाणी, पंचामृत - दूध, दही तुप, मध, साखर. एका ताटात हे पंचामृत तयार ठेवावे. प्रत्येक पदार्थ वेगळ्या भांड्यात काढावा. काही जणांकडे दह्याची पाच भांडी विरजण्याचा प्रघात आहे. प्रत्येकानी आपल्या घराण्यातील चालीप्रमाणे करावे.

घरच्या सुवासिनींनी देवीची पूजा करावी. प्रथम सुपारीचा गणपती मांडून त्याची पूजा करावी. नंतर देवीची पूजा करावी. कणकेचे दिवे लावून गणपती व देवीची आरती करतात.

दोन पाट मांडून त्यावर परात ठेवावी. (पाटाखाली बोडणाची रांगोळी काढावी.) व त्यात देवीची पूजा करावी. आरती झाल्यावर ते दिवे परातीत घ्यावे व दूधाची धार धरून ते शांत करावेत. वाढलेले नैवेद्य काहीजणांकडे आत कालवण्यास घेतात. कुमारिकेला विचारून पंचामृतातील तिला हवे असणारे पदार्थ घालावेत. ती पुरे म्हणाली की कालवणे थांबवावे. कुमारिकेनी देवी काढून घरच्या सुवासिनीला द्यावी व सुपारी व नाणे कुमारिकेने घ्यावे. तिथेच हातावर पुरण घालावे व थोडेसे कोमट पाणी घालून हात स्वच्छ करावेत. नंतर बेसिनमध्ये धुवावे.

कालविलेले द्रावण गायीस खायला द्यावे, फक्त ती गाय गाभण असता कामा नये. गाय न मिळाल्यास वाहत्या पाण्यात सोडले तरी चालते.

नंतर जेवणाचा आस्वाद घ्यावा. जेवणानंतर सुवासिनी व कुमारिका यांची कापड, नारळाने ओटी भरावी. तसेच जेवताना दक्षिणा पण ठेवावी व गजरे पण द्यावे.

बोडणाचा विधी बाराच्या आत आटोपलाच पाहिजे असा नियम आहे. बोडणासाठी जाणाऱ्या सुवासिनींनी रिकाम्या हातांनी जायचे नसते तर पंचामृतातील दूध, दही, तूप, मध, साखर यापैकी एक घेऊन जावे.

